सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (२०७० ०८८२) या मुख्य लेखाशिर्षांतर्गत -१३ कार्यालयीन खर्च या उद्दीष्टामधील तरतूदीचे १० -कंत्राटी सेवा या उद्दीष्टाखाली पुनर्वितरण. तसेच,१३- कार्यालयीन खर्च या उद्दीष्टाखाली निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- अर्थसं -०५१९/ प्र.क्र.६१/१३-स**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक :- २० मार्च, २०२०

**वाचा :-**

१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे यांचे पत्र क्र.रासनिप्रा/ निवडणूक / लेखा/ कक्ष-१५/ पावसाळी पुरवणी मागणी / ४७००/२०१९, दिनांक २१.०५.२०१९.

२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र. पुरक-२०१९/ प्र.क्र.२९/२०१९/१७-स, दिनांक १० जुलै,२०१९.

३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक :- अर्थसं ०५१९/ प्र.क्र.६१/१३-स, दिनांक २० ऑगस्ट,२०१९.

४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक २२ जानेवारी, २०२०.

५) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक :- लेखानु- २०१९/ (प्र.क्र.१२/२०१९)/१७-स, दिनांक २९ जानेवारी, २०२०

६) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन शुद्धीपत्रक क्रमांक :- अर्थसं- ०५१९/ प्र.क्र.६१/१३-स, दिनांक २६ ऑगस्ट,२०१९.

**प्रस्तावना:-**

मागणी क्रमांक व्ही-२, २०७० इतर प्रशासनीक सेवा (००) (८००)- इतर खर्च (००)(०१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (अनिवार्य) (२०७० ०८८२) या मुख्य लेखाशिर्षांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता "१०- कंत्राटी सेवा" अंतर्गत करण्यात आलेली अर्थसंकल्पिय तरतूद त्या संबंधित उद्दीष्टाखालील खर्च भागविण्याकरिता अपुरी असल्यामुळे, "१३ कार्यालयीन खर्च" अंतर्गत सन २०१९-२० करीता रुपये ८.८४ लाख अर्थसंकल्पिय तरतुदीपैकी ८०% तरतूद रुपये ७.०७ लाख वितरीत करण्यात आलेली आहे. राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण आस्थपनेवरील ६ कंत्राटी लिपिक, ७ सेवानिवृत्त कंत्राटी अधिकारी व कर्मचारी तसेच, ३ कंत्राटी शिपाई यांचे वेतन अदा करण्यासाठी आहे. जूनच्या पावसाळी अधिवेशनात रुपये ३७.१० लाख इतक्या रकमेची पुरक मागणी मंजूर झालेली आहे. त्यापैकी, रुपये २२.२६ लाख (६०%) निधी यापूर्वीच वितरीत केला आहे. आता वित्त

विभागाने दिनांक २९ जानेवारी, २०२० च्या परिपत्रकानुसार कंत्राटी सेवेवरील कर्मचाऱ्यांचे परिश्रमिक (मानधन) १०- कंत्राटी सेवा या उद्दीष्टामधून प्रदान करण्याचे निर्देश दिले असल्याने, १३- कार्यालयीन खर्च या उद्दीष्टामधील जूनच्या पावसाळी अधिवेशनात मंजूर पूरक मागणीपैकी उर्वरित (२०%) रुपये ७.४३ लाख इतकी रक्कम १०- कंत्राटी सेवा या उद्दीष्टाखाली पुनर्वितरीत करण्याच्या अटींच्या अधिन १३- कार्यालयीन खर्च अंतर्गत निधी वितरणास मान्यता दिली आहे.

२. १३- कार्यालयीन खर्च अंतर्गत सन २०१९-२० करीता रूपये ३८.११ लाख रकमेचे सुधारीत अंदाज मंजूर आहेत. त्यानुसार, १३- कार्यालयीन खर्चांतर्गत वरिल परिच्छेदात नमूद केल्यानुसार रुपये ७.४३ लाख, १०- कंत्राटी सेवा मध्ये पुनर्वितरणाने व रुपये १.३६ लाख, १३- कार्यालयीन खर्चासाठी उपलब्ध करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

मागणी क्रमांक व्ही-२, २०७० इतर प्रशासनिक सेवा,(००) (८००), इतर खर्च (००)(०१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (अनिवार्य) (२०७० ०८८२) १३- कार्यालयीन खर्चांतर्गत उपलब्ध करण्यात आलेली रुपये ७.४३ लाख (अक्षरी रुपये सात लाख त्रेचाळीस हजार फक्त )रक्कम मागणी क्र.व्ही-२, २०७० इतर प्रशासनीक सेवा (००) (८००)- इतर खर्च (००)(०१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (अनिवार्य) (२०७० ०८८२) या मुख्य लेखाशिर्षांतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता १०- कंत्राटी सेवांतर्गत पुनर्वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच, मागणी क्रमांक व्ही-२, २०७० इतर प्रशासनिक सेवा,(००) (८००), इतर खर्च (००)(०१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (अनिवार्य) (२०७० ०८८२) १३- कार्यालयीन खर्चामध्ये रुपये १.३६ लाख (अक्षरी रूपये एक लाख छत्तीस हजार फक्त) खर्च करण्यास या शासन निर्णयान्ये मान्यता देण्यात येत आहे.

२. १०- कंत्राटी सेवा अंतर्गत निधी वितरणासाठी वित्त विभागाच्या दिनांक २९.०१.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये कंत्राटी सेवेतील कर्मचाऱ्यांचे परिश्रमिक / मानधनाचा खर्च १०- कंत्राटी सेवा या उद्दीष्टांतर्गत करण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी वितरीत करण्यासाठी सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे (V0004) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून व सह सहकारी निवडणुक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.९७/व्यय-२, दिनांक १३.०२.२०२० व दिनांक २५.०२.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, सदर निधीचा विनियोग करताना वाचा क्र. ४ येथील शासन परिपत्रकात नमूद केल्याप्रमाणे मार्गदर्शक सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००३२०१६५०३१२००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.03.20 16:55:06 +05'30'

**(रमेश शिंगटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
३) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
४) अवर सचिव (१७स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभग, मंत्रालय,मुंबई.
५) उप सचिव (व्यय-२) व (अर्थ-१३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

१. मा.प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
२. निवडनस्ती कार्यासन १३-स